महाराष्ट्र विधानसभा आश्वासन समितीच्या दहाव्या अहवालांतील शिफारशींच्या अंमलबजावणीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : विसआ-२०१८/३७७/प्र.क्र.१६६/सहा**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- १७ जानेवारी, २०१९.**

वाचा :- १) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक : विसआ-२०१६/प्र.क्र.११/सहा, दिनांक २६ मे, २०१६ व दि.१६ नोव्हेंबर २०१६.

२) शासन परिपत्रक क्रमांक : विसआ-२०१६/१६०/प्र.क्र.१२३/सहा, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१६.

३) शासन पत्र व परिपत्रक क्रमांक : विसआ-२०१८/प्र.क्र.७९/सहा, दिनांक २२ मे, २०१८.

४) शासन परिपत्रक क्रमांक : विसआ-२०१८/२२४/प्र.क्र.१०७/सहा, दिनांक १८ ऑगस्ट, २०१८.

५) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय यांचे पत्र क्र. ३११६७/विसआस/ड-१४, दिनांक ५ डिसेंबर, २०१८.

**शासन परिपत्रक :-**

सन २०१४ चे चौथ्या (हिवाळी) अधिवेशनातील प्रलंबित आश्वासनांसंबंधीचा विधानसभा आश्वासन समितीचा दहावा अहवाल दिनांक ३० नोव्हेंबर, २०१८ रोजी विधानसभेत सादर करण्यात आला आहे. विधानसभा आश्वासन समितीने त्यांच्या अहवालात मंत्रालयीन विविध विभागांनी केलेल्या आश्वासन पूर्ततेच्या अनुषंगाने अभिप्रायात्मक टिप्पणी करुन काही सर्वसाधारण तसेच विशेष शिफारशी केलेल्या आहेत. त्या सारांशाने पुढीलप्रमाणे आहेत :-

**सर्वसाधारण शिफारस :-**

१) आश्वासनांच्या पूर्ततेची माहिती विहित मुदतीत म्हणजे ९० दिवसाच्या आत प्रशासकीय विभागांनी सादर करणे आवश्यक आहे. तथापि, विविध अहवालांद्वारे वेळोवेळी शासनाच्या निदर्शनास आणून देऊन सुद्धा त्यामध्ये शासनाकडून आश्वासनांची पूर्तता करण्यामध्ये फारशी सुधारणा झाल्याचे समितीला आढळून आले नाही. तथापि, अधिकाऱ्यांद्वारा या बाबींसंदर्भात अक्षम्य विलंब केला जात असल्यामुळे याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्यावर निश्चित करुन त्यासंदर्भात शासनाने कडक धोरण आखून आश्वासनांची पूर्तता ही कोणत्याही परिस्थितीमध्ये ९० दिवसांच्या आत करण्याबाबत शासनाने एक सर्वंकष निर्णय घेऊन या आश्वासनांच्या पूर्ततेबाबत संबंधित विभागाचे उप सचिव तथा सह सचिव यांच्यावर जबाबदारी निश्चित करुन आश्वासन पूर्ततेसंदर्भात जाणीवपूर्वक दिरंगाई किंवा हलगर्जीपणा

झाल्यास अशा अधिकाऱ्यांविरुद्ध ठोस कारवाई करण्याबाबत धोरण ठरवून निर्णय घेण्यात यावा.

२) आश्वासनांच्या पूर्ततेसंबंधी जलद गतीने व विहित मुदतीत निपटारा होण्यासंदर्भात संबंधित विभागांच्या विभाग प्रमुखांनी दर तीन महिन्याला विभागाच्या संबंधित उप सचिव / सह सचिव यांचे समवेत आढावा बैठका घेऊन जी आश्वासने सहज पूर्ण करणे शक्य आहे. अशा बाबतीत त्वरेने निर्णय घेऊन त्या संबंधीचे आश्वासनपूर्तीचे विवरणपत्र संसदीय कार्य विभागास सभागृहाच्या पटलावर ठेवण्यासाठी लवकरात लवकर पाठविण्यात यावे. तसेच, याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल समितीला एक महिन्याच्या आत विहित मुदतीत पाठविण्यात यावा. या संदर्भात जाणीवपूर्वक दिरंगाई झाल्यास अशा अधिकाऱ्यांविरुद्ध ठोस कारवाई करण्याबाबत निर्णय घेण्यात यावा.

३) संबंधित विभागाने आश्वासनांची पूर्तता संसदीय कार्य विभागाकडे करताना प्रत्येक आश्वासनांच्या पूर्ततेच्या ४० हार्ड प्रती तसेच, विवरणपत्रे "सॉफ्ट कॉपी" मध्ये घेऊन ती विधानमंडळाकडे संसदीय कार्य विभागाने सादर करावी. तसेच सभागृहात मा. मंत्री महोदयांनी आश्वासन दिल्यानंतर लगतच्या अधिवेशनात आश्वासनांच्या पूर्ततेची विवरणपत्रे सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात यावी, हा उद्देश असून विधानसभेच्या नियमानुसार आश्वासनांच्या पूर्ततेबाबत ९० दिवस इतक्या कालावधीची मार्यादा घालून दिली आहे. सदर मर्यादेचे उल्लंघन कोणत्याही परिस्थितीत होऊ नये, यासाठी संबंधित विभागाच्या उप सचिव / सह सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांवर जाबाबदारी निश्चित केल्यास आश्वासनांची पूर्तता ही वेळेत होऊ शकेल. तसेच, आश्वासनांचे विवरणपत्र सभागृहाच्या पटलावर विहित कालावधीत ठेवण्यासाठी शासनाने कडक धोरण आखावे, असे समितीचे मत आहे. हे सर्व करुन सुद्धा जाणीवपूर्वक व हेतूपुरस्सर संबंधित विभागाच्या उप सचिव / सह सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांकडून दिरंगाई व कर्तव्यात कसूर होत असल्यास सर्वंकष निर्णय घेऊन त्या अधिकाऱ्यावर शिस्तभंगाची कार्यवाही करावी व त्यासंबंधीचे तातडीने परिपत्रक निर्गमित करुन त्याबाबतचा अहवाल विधानसभा आश्वासन समितीला एक महिन्याच्या आत सादर करण्यात यावा.

**<u>विशेष शिफारस</u> :-**

विभागीय सचिवांच्या साक्षीच्या वेळी संबंधित विभागीय सचिव / प्रधान सचिव अनेकदा या ना त्या कारणावरुन समितीसमोर साक्ष देण्यास अनुपस्थित असतात किंवा उपलब्ध होत नाहीत. त्यांच्या अनुपस्थितीत त्यांच्याऐवजी त्यांच्या विभागातील सह सचिव / उप सचिव / अवर सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांना साक्षीसाठी हजर राहण्यासाठी सांगितले जाते. असे अधिकारी समितीसमोर परिपूर्ण माहिती देऊ शकत नसल्यामुळे समितीला निर्णयाविना बैठका पुढे ढकलाव्या लागतात. याबाबत समितीने तीव्र नाराजी व्यक्त केली

असून शासनाच्या संबंधित अधिकाऱ्यांच्या या भूमिकेचे कठोर शब्दात अहवालात नापसंती नमूद केली आहे. संसदीय लोकशाहीमध्ये समित्यांचे अनन्य साधारण महत्त्व लक्षात घेता राज्य शासनाचे अधिकारी समितीच्या सर्व प्रश्नांची उत्तरे देण्यास बांधील असतांना समितीच्या बैठकीत आश्वासित केलेली माहिती विहित वेळेत न देणे आणि समितीसमोर समाधानकारक उत्तर न देता माहिती सादर केली जाईल, असे आश्वासित केले जाते. यावरुन संबंधित विभागाचे अधिकारी हे समितीसमोर येताना संबंधित आश्वासनांची परिपूर्ण माहिती घेऊन उपस्थित राहणे आवश्यक असल्याने शासनाच्या मुख्य सचिवांमार्फत सर्व विभागांना कडक शब्दात पत्राद्वारे निदेश देण्याबाबत आश्वासन समितीने विशेष शिफारस केली आहे.

२. विधानसभा आश्वासन समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने विभागामार्फत यापूर्वी वेळोवेळी सर्व मंत्रालयीन विभागांना संदर्भाधीन अनुक्रमांक १, ३ व ४ येथील परिपत्रकान्वये स्पष्ट सूचना देण्यात आल्या आहेत. तरी, विधानसभा आश्वासन समितीने त्यांच्या दहाव्या अहवालात निदेशित केलेल्या वरील नमूद सर्वसाधारण तसेच विशेष शिफारशींचे गांभिर्याने अनुपालन करण्याची दक्षता सर्व मंत्रालयीन विभागांच्या सचिवांनी घ्यावी व त्याबाबत केलेल्या कार्यवाहीची माहिती प्रत्येक विभागाने विहित विववरणपत्रात महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयास विहित मुदतीत सादर करण्यात यावी.

विधिमंडळाच्या विधानसभागृहात मा. मंत्री / राज्यमंत्री यांनी दिलेल्या आश्वासनांचा आशय लक्षात घेता, काही अपरिहार्य कारणामुळे विधानसभा आश्वासनाची पूर्तता होऊ शकत नसेल व ती वगळावयाची असेल तर आश्वासन वगळण्याबाबत योग्य त्या समर्थनासह संबंधित विभागाच्या मा. मंत्री अथवा मा. राज्यमंत्री यांच्या स्वाक्षरीने मा. समिती प्रमुख, विधानसभा आश्वासन समिती यांना विहित कालावधीत (९० दिवसात) विनंती करण्यात यावी व समितीने त्यास मान्यता दिल्यानंतर, त्याबाबतचा अहवाल संसदीय कार्य विभागास पाठविण्यात यावा. तसेच, ज्या आश्वासनांची पूर्तता अपरिहार्य कारणामुळे विहित मुदतीत म्हणजेच ९० दिवसांत करणे शक्य नाही अशा प्रकरणी ही बाब योग्य स्पष्टीकरणासह संबंधित आश्वासन समितीच्या निदर्शनास आणावी व माहिती पाठविण्याकरिता त्यांच्याकडून मुदतवाढ मागवून घ्यावी.

३. उपरोक्त निर्देशाचे काटेकोरपणे अनुपालन करण्याची सर्व मंत्रालयीन विभागांनी कृपया कटाक्षाने दक्षता घ्यावी.

प्रस्तुत परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९०११७१६०२२४४७१५ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Kumar Jain

Digitally signed by Dinesh Kumar Jain
DN: c=IN, o=All India Services, ou=CS Office Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=ea3b8615acaf5a916338801298bc1b7123bd0cac17faf57848ccd7382e28252c, serialNumber=68589315014f4975fabfc7b90950c610d8b0535fa12b345b7e19fe84a006a889,
cn=Dinesh Kumar Jain
Date: 2019.01.17 16:54:01 +05'30'

**(दिनेश कुमार जैन)**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) सर्व मंत्रालयीन विभाग
३) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-४०० ०३२. *(पत्राद्वारे)
४) निवड नस्ती.